विधि व न्याय विभागातील विधि विधान शाखेमध्ये सुरु झालेल्या "विधि विधान इंटर्नशिप" उपक्रमांतर्गत व्याख्यात्यांना देण्यात येणाऱ्या मानधनाचे दर निश्चित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग, विधि विधान शाखा,**
**शासन निर्णय क्रमांक : एलइजी-५२१/ब, २०२४,**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई-४०००३२.
दिनांक : ०४ जून, २०२४.

**संदर्भ :-** (१) शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, क्रमांक १०८२/ब, २०२३, दिनांक २४ नोव्हेंबर २०२३.

(२) शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, क्रमांक ४९७/ब, २०२४, दिनांक ९ मे २०२४.

**प्रस्तावना :-**

विधि व न्याय विभागाच्या विधि विधान शाखेमध्ये संदर्भ क्रमांक १ च्या मान्यतेप्रमाणे विधि विधान इंटर्नशिप उपक्रम सुरु करण्यात आला आहे. सदर "विधि विधान इंटर्नशिप" उपक्रमांतर्गत कायदेविषयक शिक्षण घेत असलेल्या विद्यार्थ्यांना विधि विधान, नियम, अधिसूचना यांच्याशी सबंधीत विविध विषयांवर व्याख्याने आयोजित करण्यात येतात. सदर उपक्रमांतर्गत मंत्रालयीन विभागांतील पदस्थ अधिकारी किंवा सेवानिवृत्त अधिकारी किंवा इतर विधि क्षेत्रातील तज्ज्ञ व्यक्ती यांना प्रशिक्षणार्थींना मार्गदर्शन करण्याकरिता आमंत्रित करण्यात येते. उक्त उपक्रमांतर्गत प्रशिक्षणार्थींना विद्यावेतन तसेच सदर उपक्रमासंदर्भातील इतर अनुषंगिक बाबींकरीताच्या आवर्ती खर्चास (व्याख्यात्यांचे मानधन व प्रवास खर्च, अल्पोपहार, आवश्यक स्टेशनरी, प्रशिक्षणार्थींना क्षेत्रीय भेट (Field Visit), इत्यादी) करीता संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयानुसार मान्यता देण्यात आलेली आहे. उक्त उपक्रमांतर्गत विद्यार्थ्यांना मार्गदर्शन करण्यासाठी येणाऱ्या व्याख्यात्यांना मानधन व प्रवासखर्च याचा दर निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विधि व न्याय विभागाच्या विधि विधान इंटर्नशिप उपक्रमामध्ये मार्गदर्शन करण्यासाठी येणाऱ्या व्याख्यात्यांना द्यावयाच्या मानधनाचा दर खालीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | पदनाम/ व्याख्याते | मानधनाचा दर |
|---|---|---|
| १. | विभागातील व मंत्रालयीन विभागातील पदस्थ अधिकारी | १०००/- रु. प्रति व्याख्यान |
| २. | सेवानिवृत्त अधिकारी किंवा इतर विधि क्षेत्रातील (तज्ज्ञ) व्यक्ती | २०००/- रु. प्रति व्याख्यान (प्रवास खर्चासह) |

२. विधि विधान इंटर्नशिप उपक्रमांतर्गत नेमण्यात येणाऱ्या व्याख्यात्यांचे मानधनाचे दर हे सदर शासन निर्णयाच्या दिनांकापासून लागू होतील. यावर होणारा खर्च, "मागणी क्रमांक जे-०२, २०५२, सचिवालयीन- सर्वसाधारण सेवा, लेखाशिर्ष-००३, प्रशिक्षण, (००) (०२) विधि विधान इंटर्नशिप उपक्रम (अनिवार्य), (२०५२५४१२) अंतर्गत १३-कार्यालयीन खर्च" या उद्दिष्टाखाली त्या-त्या वर्षीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४४/व्यय-५, दिनांक २९.०१.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर हा शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०६०४११२८०६७४१२ असा आहे. सदरचा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SATISH BABAN WAGHOLE

Digitally signed by SATISH BABAN WAGHOLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=a8a564a8b86f10dd055a40390fac5e201097ebdc6d10d54485928bc2ca8562f4, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=4C1735DC74D982FD392B01D4C40FE989C2B0CAA52814EA95C856B28E1379DC21, cn=SATISH BABAN WAGHOLE
Date: 2024.06.04 11:42:19 +05'30'

**( सतिश वाघोले )**
**सचिव (विधि विधान), महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव.
४) मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव.
५) मा. विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिचालय, मुंबई.
६) मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिचालय, मुंबई.
७) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
८) महालेखापाल-२, महाराष्ट्र (लेखा परीक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०) वित्त विभाग (आपुक)/ (व्यय-५)/ (वित्तीय सुधारणा), मंत्रालय, मुंबई.
११) कक्ष अधिकारी (कार्यासन- २ अ), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) कक्ष अधिकारी (कार्यासन- २०), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) कक्ष अधिकारी (कार्यासन- २३), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) निवड नस्ती/ “ब” शाखा.